**बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम,२००९ नूसार उच्च प्राथमिक शाळांमध्ये अतिथी निदेशकांचे (Guest Instructor) पथक (Panel) तयार करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन शुद्धीपत्रक क्र. न्यायाप्र-२०१५/प्र.क्र.४/१५/टीएनटी-२

मंत्रालय विस्तार भवन मुंबई ४०० ०३२

दिनांक : १ जून , २०१७

<u>वाचा</u> - १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : न्यायाप्र-२०१५/प्र.क्र.४/१५/ टीएनटी-२, दिनांक ७.१०.२०१५

२) शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : न्यायाप्र-२०१५/प्र.क्र.४/१५/ टीएनटी-२, दिनांक ७.१.२०१७

**<u>प्रस्तावना-</u>**

केंद्र शासनाचा बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ (RTE Act २००९) मधील कलम २५ आणि परिशिष्टातील तरतुदींची अंमलबजावणी करण्यासाठी महाराष्ट्र बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार नियम, २०११ अधिसूचित करण्यात आला आहे. RTE Act २००९ मधील तरतूदींनुसार ज्या उच्च प्राथमिक शाळांची (इ. ६ वी ते ८ वी) पटसंख्या १०० पेक्षा जास्त आहे, अशा उच्च प्राथमिक शाळांमध्ये (i)कला (ii) शारीरिक शिक्षण व आरोग्य आणि (iii)कार्यानुभव या तीन विषयांसाठी अंशकालीन निदेशक नियुक्त करण्याची तरतूद आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अतिथी निदेशकांचे (Guest Instructor) पॅनल (पथक) तयार करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. सदर शासन निर्णयात संदर्भाधीन क्र.२ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये सुधारणा करण्यात आली आहे. अतिथी निदेशकांना त्यांचे मानधन विहित मुदतीत मिळत नसल्याची तक्रार प्राप्त झाल्याने सदर शासन निर्णय व शुध्दीपत्रकातील निकष सुधारित करण्याची बाब शासनाकडे प्रस्तावित होती. त्यानुसार सदर शासन शुध्दीपत्रकात पुढील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**<u>शासन शुद्धीपत्रक</u> :-**

संदर्भाधीन क्र.२ येथील दि.७ जानेवारी, २०१७ च्या शासन शुध्दीपत्रकात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :

१) ख) अतिथी निदेशक या पॅनेलवर नियुक्तीच्या अटी मधील अट, क्र. (९) सुधारण्यात येत असून ती पुढीलप्रमाणे वाचावी :

"सर्व शिक्षा अभियांनांतर्गत वार्षिक कार्य योजना व भारत सरकारने अंदाज पत्रकात मंजूर केलेल्या तरतुदींच्या मर्यादेत पॅनलमधील अतिथी निदेशकांना प्रती तासिका रुपये ५०/-रुपये आणि माहे कमाल ५०००/- (पाच हजार फक्त) (जास्तीत जास्त १०० तासिका ) या मर्यादेत मानधन अनुज्ञेय राहील. तसेच अतिथी निदेशकांना एका पेक्षा अधिक संस्था / शाळांमध्ये काम करण्याची अनुमती राहील मात्र मानधनाची एकत्रित कमाल मर्यादा रु.५०००/- राहील. अतिथी निदेशकांना दरमहा मिळणारे मानधन संबंधित अतिथी निदेशकांच्या बचत खात्यात थेट जमा करण्यात यावे.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०६०३१६४७४२२६२१ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.06.03 16:46:07 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
२) सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय,मंत्रालय,मुंबई
४) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई.
५) शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य,पुणे-१
६) शिक्षण संचालक, (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे-१
७) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे-
८) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
९) शिक्षण निरिक्षक (उत्तर /पश्चिम /पुर्व), मुंबई
१०) सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१२) सर्व शिक्षणाधिकारी ( प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद
१३) खाजगी सचिव, मा.मंत्री शालेय शिक्षण,मंत्रालय,मुंबई
१४) शालेय शिक्षण विभागाचे सर्व कार्यासने,
१५) कार्या.व्यय-५, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६) निवडनस्ती, ( टीएनटी-२ )